2011011415340400१

**पिंपरी-चिंचवड महानगरपालिका**
**पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील पदांचे वेतनश्रेणीबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पीसीसी ३००६/८२१/प्र.क्र.१५५/०६/नवि-२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- १४ डिसेंबर, २००७**

**वाचा :-** (१) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३ अ/कावि/२५/०६ दिनांक ३/३/२००६ व त्यासोबतचा मनपा महासभा ठराव क्र.५०६१, दिनांक ४/१२/२००३ व ठराव क्र.५२३४, दिनांक १३/७/२००४

(२) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३ अ/कावि/६०/०६ दिनांक १५/६/२००६

(३) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३ अ/कावि/११२/०६ दिनांक २९/८/२००६

(४) या विभागाचे क्रमांक -पीसीसी ३००६/८२१/प्र.क्र.१५५/०६/नवि-२२, दिनांक १४/११/२००६ चे पत्र

**प्रस्तावना :--**

पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या कर्मचारी महासंघाने, महापालिकेच्या ठरावानुसार मान्यता दिल्याप्रमाणे काही पदांच्या वेतनश्रेणीतील त्रुटी दूर करण्याची मागणी केली होती. त्या अनुषंगाने याबाबत चर्चा करुन, वेतनश्रेणीतील त्रुटी दूर करुन वेतनश्रेणीची पुनर्रचना करण्यासाठी आयुक्तांच्या अध्यक्षतेखाली महापालिकेतील अधिकारी व कर्मचारी महासंघाचे प्रतिनिधी यांची संयुक्त समिती नियुक्त करण्यात आली होती. या समितीने मान्यता दिलेल्या आणि महापालिकेने महासभा ठरावाव्दारे मान्यता दिलेल्या काही पदांच्या वेतनश्रेण्या सुधारित करणे आवश्यक असल्याचा निर्णय समितीच्या बैठकीनंतर झाला. पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या महासभा ठराव क्रमांक ५०६१, दिनांक ४/१२/२००३ व महासभा ठराव क्र.५२३४, दिनांक १३/७/२००४ अन्वये महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कॉम्प्युटर ऑपरेटर या पदाची वेतनश्रेणी रु.४०००-६००० ऐवजी रु.५५००-१७५-९००० आणि कॉम्प्युटर प्रोग्रॅमर या पदाची वेतनश्रेणी रु.५०००-८००० ऐवजी रु.६५००-२००-१०५०० या प्रमाणे सुधारित करण्याचा ठराव महापालिकेने पारित केला आहे. उपरोक्त महापालिका महासभा ठराव आणि कर्मचारी महासंघ आणि अधिकारी यांच्या समितीच्या बैठकीतील निष्कर्ष या अनुषंगाने आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कॉम्प्युटर प्रोग्रॅमर, कॉम्प्युटर ऑपरेटर या पदांच्या वेतनश्रेणी शासनाशी सुसंगत करण्याची मागणी विचारात घेऊन या पदांची वेतनश्रेणी सुधारित करण्याचा प्रस्ताव संदर्भाधीन पत्रान्वये शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे. सदरील प्रस्ताव यापूर्वी संदर्भाधीन क्रमांक (४) च्या पत्रान्वये अमान्य करण्यात आला होता. तथापि प्रस्तुत प्रकरणी स्थानिक लोकप्रतिनिधी आणि पिंपरी-चिंचवड महानगरपालिका कर्मचारी महासंघ यांनी शासनाकडे या

महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कॉम्प्युटर ऑपरेटर, कॉम्प्युटर प्रोग्रॅमर यांची वेतनश्रेणी शासनाकडील या पदांसाठी असलेल्या वेतनश्रेणीशी सुसंगत करुन सुधारित करण्याबाबत सातत्याने पाठपुरावा केल्याने विषयाधीन पदांची वेतनश्रेणी सुधारित करण्याची बाब शासनाच्या फेर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :--** आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी महासभा ठराव क्रमांक ५०६१, दिनांक ४/१२/२००३ व महासभा ठराव क्र. ५२३४, दिनांक १३/७/२००४ अनुषंगाने महापालिकेच्या आस्थापनेवरील कॉम्प्युटर ऑपरेटर व कॉम्प्युटर प्रोग्रॅमर या पदाची वेतनश्रेणी खालील प्रमाणे सुधारित करण्यासाठी सादर केलेल्या प्रस्तावास महानगरपालिकेचा आस्थापना खर्च, पदांची शैक्षणिक अर्हता विचारात घेऊन, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ५१ (४) मधील तरतुदीस अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| पदनाम | सध्याची वेतनश्रेणी | सुधारित वेतनश्रेणी |
|---|---|---|
| कॉम्प्युटर ऑपरेटर | रु.४०००-६००० | रु.५५००-१७५-९००० |
| कॉम्प्युटर प्रोग्रॅमर | रु.५०००-८००० | रु.६५००-२००-१०५०० |

०२. या आदेशानुषंगाने आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी सर्व संविधानिक बाबींची पूर्तता करुन शासनास अहवाल सादर करावा.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,**

Issued

**( सुनील कोठेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मंबई ४०० ०३२
(२) मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
(३) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे,
(४) प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
(५) निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई